मराठी चित्रपटांना अर्थसहाय्य मंजूर करण्यासाठी चित्रपट परीक्षण समितीची पुनर्रचना करणेबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग**
**शासन निर्णय क्रमांक: गोचिन-२०१८/ प्र.क्र.६३ /सां.का.१**
मंत्रालय (विस्तार), मादाम कामा मार्ग,
हुतात्मा राजगुरु चौक, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक : २९ नोव्हेंबर, २०१८.

वाचा :१) शासन निर्णय, पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग क्र. संकीर्ण-२०१५/प्र.क्र.७७/ सां.का.१, दि.०६.०५.२०१५.
२) शासन निर्णय पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग क्र. संकीर्ण-२०१५/प्र.क्र.७७/ सां.का.१, दि.०५.१०.२०१६

**प्रस्तावना :-**

शासनातर्फे राबविण्यात येणाऱ्या "दर्जेदार **मराठी चित्रपट निर्मितीस अर्थसहाय्य मंजूर करणेबाबतच्या"** योजनेअंतर्गत अर्थसहाय्य मंजूर करण्यासाठी चित्रपट परीक्षण समिती उपर्निर्दिष्ट क्र.१ व २ येथील शासन निर्णयान्वये गठीत करण्यात आली होती. सदर समितीचा कार्यकाल संपुष्टात आला असल्याने नव्याने समिती गठीत करण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता. त्यासंदर्भात शासनाने पुढीलप्रमाणे निर्णय घेतला आहे.

**शासन निर्णय :**

शासन निर्णय दि.०६.०५.२०१५ अन्वये दर्जेदार मराठी चित्रपट निर्मितीस अर्थसहाय्य मंजूर करण्यासाठी चित्रपटांचे परीक्षण करुन दर्जा निश्चित करण्याकरीता व अर्थसहाय्याची शिफारस करण्यासाठी गठीत करण्यात आलेल्या चित्रपट परीक्षण समितीचा कार्यकाल संपुष्टात आल्याने समितीची पुनर्रचना करण्यात येत आहे. या पुनर्रचित समितीतील अशासकीय सदस्यांची नावे पुढीलप्रमाणे आहेत :-

| अ.क्र. | अशासकीय सदस्यांची नावे |
|---|---|
| १ | श्री. एन. चंद्रा |
| २ | श्री. अशोक पत्की |
| ३ | श्री.सुरेश देशमाने |
| ४ | श्री.प्रमोद पवार |
| ५ | श्री.प्रताप गंगावणे |
| ६ | श्री.सुनील मांजरेकर |
| ७ | श्रीमती किशोरी अंबिये |
| ८ | श्री.पुरुषोत्तम लेले |
| ९ | श्री.हेमंत एदलाबादकर |
| १० | श्री.महेश नाईक |

| अ.क्र. | अशासकीय सदस्यांची नावे |
|---|---|
| ११ | श्रीमती मधुरा वेलणकर-साटम |
| १२ | श्री.शाम सोनाळकर |
| १३ | श्री.रवी जाधव |
| १४ | श्रीमती किशोरी शहाणे |
| १५ | श्री.मनोहर सरवणकर |
| १६ | श्री.अमर मोहिले |
| १७ | श्री.अजित दांडेकर |
| १८ | श्रीमती भक्ती मायाळू |
| १९ | श्रीमती शर्वाणी पिल्ले |
| २० | अध्यक्ष, अखिल भारतीय मराठी चित्रपट महामंडळ |

सह व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र चित्रपट, रंगभूमी आणि सांस्कृतिक विकास महामंडळ, मुंबई हे या समितीचे सदस्य सचिव म्हणून काम पाहतील.

२. शासनातर्फे राबविण्यात येणाऱ्या “दर्जेदार **मराठी चित्रपट निर्मितीस अर्थसहाय्य मंजूर करणेबाबतच्या”** योजनेनुसार चित्रपटांचे परीक्षण करुन अर्थसहाय्याकरीता पात्र चित्रपटांची शिफारस करण्यासाठी गठीत करण्यात आलेली चित्रपट परीक्षण समिती, व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र चित्रपट, रंगभूमी आणि सांस्कृतिक विकास महामंडळ, दादासाहेब फाळके चित्रनगरी महामंडळ, गोरेगांव, मुंबई यांचे अधिनस्त कार्यरत राहील. या समितीचा कार्यकाल या शासन निर्णयाच्या दिनांकापासून तीन वर्ष अथवा शासनाचे पुढील आदेश होईपर्यंत असेल.

३. चित्रपट परीक्षणाकरीता ३३ टक्के सदस्यांची उपस्थिती आवश्यक राहील. समिती सदस्यांनी केलेल्या शिफारशींवर योजनेतील तरतुदीनुसार पुढील कार्यवाही व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र चित्रपट, रंगभूमी आणि सांस्कृतिक विकास महामंडळ, दादासाहेब फाळके चित्रनगरी महामंडळ, गोरेगांव, मुंबई यांचेकडून करण्यात येईल.

४. या समितीवरील अशासकीय सदस्यांना वित्त विभागाच्या प्रचलित नियमानुसार प्रवास भत्ता, बैठक भत्ता व मानधन अनुज्ञेय राहील. यासाठी होणारा खर्च दादासाहेब फाळके चित्रनगरी महामंडळ, गोरेगांव, मुंबई यांनी त्यांना योजनेंतर्गत मिळणाऱ्या सेवाशुल्कातून भागवावा.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक क्रमांक २०१८११२९१७४०१९४९२३ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Shailesh Tukaram Jadhav

Digitally signed by Shailesh Tukaram Jadhav
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Tourism And Cultural Affairs Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=2f28af075ed91b64d12528e9ab00bb144f43fcf33c23ccf14c820b969f8ca273, serialNumber=a90555ec4a073187eb44ee0b1aa93e5c855afff34eedb4b03bb3e0a6cfd6271c, cn=Shailesh Tukaram Jadhav
Date: 2018.11.30 11:52:37 +05'30'

**( शैलेश तु. जाधव )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. मा.राज्यपाल यांचे सचिव, राजभवन, मलबार हिल, मुंबई,
२. मा.मुख्यमंत्री, यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
३. मा.विरोधी पक्ष नेता, विधानसभा/विधान परिषद, विधानमंडळ, मुंबई.
४. सर्व सन्माननीय विधानमंडळ सदस्य, महाराष्ट्र राज्य.
५. मा.मंत्री, सांस्कृतिक कार्य यांचे खाजगी सचिव.
६. प्रधान सचिव,सांस्कृतिक कार्य, यांचे स्वीय सहायक,पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग, मंत्रालय, मुंबई
७. व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र चित्रपट रंगभूमी आणि सांस्कृतिक विकास महामंडळ, दादासाहेब फाळके चित्रनगरी, गोरेगांव (पूर्व), मुंबई - ४०० ०६५.
८. व्यवस्थापकीय संचालक, कोल्हापूर चित्रनगरी महामंडळ, कोल्हापूर.
९. संचालक, सांस्कृतिक कार्य संचालनालय, मुंबई.
१०. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) १ मुंबई, महाराष्ट्र.
११. महालेखापाल (लेखा परीक्षा) १ मुंबई, महाराष्ट्र.
१२. चित्रपट परिक्षण समितीचे नवनियुक्त सर्व सदस्य, द्वारा - दादासाहेब फाळके चित्रनगरी, गोरेगांव (पूर्व), मुंबई.
१३. निवड नस्ती, सां.का.१.